<u>महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण, २००१</u>
**महाराष्ट्र स्पोर्टस् इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट प्लॅन अंतर्गत क्रीडा सुविधा निर्माण करणे.**

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१८/ प्र.क्र. ५१/क्रीयुसे-१**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
तारीख: २५ ऑक्टोबर, २०१८

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक राक्रीधो २००३/प्र.क्र. ११/ क्रीयुसे-१, दि. २६/३/२००३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक राक्रीधो-२००४/ प्र.क्र. ११०/ क्रीयुसे-१, दिनांक ७/१२/२००५.
३) शासन पत्र क्रमांक बैठक- २०१८/ प्र.क्र. ८७/क्रीयुसे-१, दिनांक ८/१०/२०१८.

**<u>शासन शुध्दीपत्रक</u> -**

दिनांक २६/३/२००३ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासनाने राज्यात महाराष्ट्र स्पोर्टस् इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट प्लॅन अंतर्गत क्रीडा सुविधा निर्माण करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर आदेशातील तरतूदीनुसार, संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील तालुका क्रीडा संकुल, जिल्हा क्रीडा संकुल तसेच विभागीय क्रीडा संकुलातील सोयी सुविधांचा वापर तसेच संकुलाचा वाणिज्यिक प्रयोजनाकरीता करण्यासंदर्भात मार्गदर्शक तत्वे व निकष निश्चित करण्यात आले आहेत.

२. उपरोक्त दि. ७/१२/२००५ च्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या मार्गदर्शक तत्वानुसारे परिशिष्ट-अ मधील “विभागीय/ जिल्हा क्रीडा संकुलाच्या वापराबाबत मार्गदर्शक तत्वे” याखाली अ.क्र. ८ व ९ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**अ.क्र. ८.** क्रीडा व्यतिरिक्त इतर कारणांसाठी विभागीय/ जिल्हा/ तालुका क्रीडासंकुल/ खेळाचे मैदान उपलब्ध करुन देताना त्या कालावधीत खेळाच्या वापरासाठी मागणी असेल तेव्हा प्रथम खेळासाठी प्राधान्याने उपलब्ध करुन दिली जाईल. जर एखादे संकुल विनावापर राहणार असेल, त्या दिवसाकरीता,

(अ) १ ते ३ दिवस या कालावधीसाठी एकावेळी एक प्रयोजनासाठी एका संस्थेला MRTP Act मधील तरतूदीनुसार उपलब्ध करुन देण्याचे अधिकार विभागीय उपसंचालक यांना राहतील.

(ब) एकावेळी एक प्रयोजनासाठी एका संस्थेला ४ ते ७ दिवसापर्यंत उपलब्ध करुन द्यावयाचे असेल तर त्यास शासकीय विभागप्रमुख म्हणजेच सचिव/ प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव, क्रीडा यांची मान्यता घेण्यात यावी.

(क) एकावेळी एक प्रयोजनासाठी एका संस्थेला ८ दिवसापेक्षा जास्त कालावधीकरीता संकुलाची आवश्यकता असेल तेव्हा शासनाची मान्यता घेणे बंधनकारक असेल अशा क्रीडा व्यतिरिक्त वापरामधून जमा झालेल्या निधीपैकी २५ टक्के निधी संबंधित संकुल समितीने "राज्य क्रीडा विकास निधी" मध्ये जमा करावा.

(ड) क्रीडा संकुलातील जागेचे अथवा क्रीडा सुविधांचा वापर राजकीय कारणासाठी करण्यात येऊ नये.

३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी क्रीडा संकुलातील प्राप्त जागेपैकी काही जागेचा वापर सामाजिक/ सांस्कृतिक/धार्मिक/वाणिज्यिक वापरासाठी उपलब्ध करुन देण्याबाबतचे दर संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये सूचित केल्यानुसार निश्चित करण्यात यावेत. या दराचा दोन वर्षानी आढावा घेऊन प्रशासकीय विभागाची मान्यता घ्यावी.

४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१०२५१४२४५६३८२१ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.10.25 14:28:30 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव.
४) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव.
५) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद यांचे सचिव.
६) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
७) सर्व विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा.
८) सर्व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद.

९) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१३) सर्व विभागीयआयुक्त (महसूल)
१४) सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा क्रीडा संकुल समिती (आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्यामार्फत)
१५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
१६) सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्यामार्फत)
१७) सर्व जिल्हा / तालुका क्रीडा अधिकारी (आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्यामार्फत)
१८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/ २, मुंबई/ नागपूर.
१९) महालेखापाल (लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र १/ २, मुंबई/ नागपूर.
२०) ग्रंथपाल, विधीमंडळ
२१) विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
२२) अवर सचिव, (क्रीयुसे - २, क्रीयुसे -३)
२३) निवडनस्ती, क्रीयुसे-१.